<u>एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम</u>
**परिवीक्षाधीन कालावधीच्या शेवटच्या टप्प्यात प्रशिक्षण संस्थेमार्फत घेण्यात येणा-या परीक्षेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-१११४/ प्र.क्र. ८४/१८-ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०१५.

**<u>वाचा :</u>**

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.

**<u>प्रस्तावनाः-</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सरळसेवेने गट-अ आणि गट-ब मध्ये नियुक्त होणा-या विविध १९ संवर्गातील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याबाबत शासनाने उपरोक्त वाचा येथील दिनांक २०.१.२०१४ अनुसार निर्णय घेतला आहे.

२. या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधीतील शेवटचा टप्पा क्रमांक (६) मध्ये सर्व परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांचे मूल्यमापन करण्यासाठी यशदा व वनामती येथे संबंधित परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांच्या विभागाच्या कामकाजाशी तसेच त्यांच्या पदाच्या कर्तव्य व जबाबदारीशी निगडीत आणि प्रशिक्षणा दरम्यान शिकविलेल्या बाबींशी संबंधित विषयांवर २०० गुणांची परीक्षा आयोजित करण्यात येईल. या परिक्षेत मिळालेले एकूण गुण आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवड प्रक्रीयेत त्या परिवीक्षाधीन अधिकाऱ्याला मिळालेले एकूण गुण (मुख्य परीक्षा आणि मुलाखतीचे गुण) यांची बेरीज करुन त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची संबंधित संवर्गातील त्या तुकडीत अंतिम सेवाज्येष्ठता ठरविण्यात येईल आणि अशा प्रकारे ठरविली जाणारी अंतिम सेवाज्येष्ठता पदोन्नती तसेच सेवा विषयक सर्व अनुषंगिक बाबींसाठी लागू राहील, असाही निर्णय शासनाने घेतलेला आहे.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या राज्यसेवा परीक्षा-२०१३ च्या आधारे शिफारसप्राप्त झालेल्या २०१४ च्या तुकडीतील गट-अ व गट-ब मधील परिवीक्षाधीन अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमध्ये दिनांक ९.६.२०१४ पासून सुरु करण्यात आला आहे. या परिवीक्षाधीन अधिका-यांचे तसेच यापुढील सर्व तुकडीतील अधिका-यांचे परिवीक्षाधीन कालावधीत कशा प्रकारे मूल्यमापन करण्यात यावे, यासंबंधीची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

याबाबत यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्था आणि संबंधित विभागांशी विचार विनिमय करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

परिवीक्षाधीन अधिका-यांच्या दोन वर्षाच्या व ६ टप्प्यांच्या परिवीक्षाधीन कालावधीतील लेखी परीक्षा व प्रशिक्षण संस्थांच्या संचालकांनी परिवीक्षाधीन अधिका-यांच्या केलेल्या मूल्यमापनाला खालील तक्त्यामध्ये नमूद केल्यानुसार एकूण गुणांची विभागणी निश्चित करण्यात येत आहे,

| अ. क्र. | प्रशिक्षण टप्पा | लेखी परीक्षेद्वारे मूल्यमापन | यशदा/ वनामती चे संचालक आणि विभागाच्या नियंत्रक अधिका-यांचे मूल्यमापन *** | एकूण गुण |
|---|---|---|---|---|
| १ | पायाभूत प्रशिक्षण | २० | १० | ३० |
| २# | अनिवार्य संलग्नता (Attachment) | ३ | २ | ५ |
| ३# | तांत्रिक प्रशिक्षण | ६* | ४* | १० |
| ४# | जिल्हास्तरीय प्रशिक्षण | ४०** | १०** | ५० |
| ५# | महाराष्ट्र व महाराष्ट्राबाहेरील दौरा | ३ | २ | ५ |
| ६ | पुर्नविलोकन/उजळणी कार्यक्रम | ९० | १० | १०० |
| | **एकूण गुण** | **१६२** | **३८** | **२००** |

* तांत्रिक प्रशिक्षणाची व्यवस्था ज्या विभागांकडे नाही अशा विभागाच्या नियंत्रणातील संवर्गांचे तांत्रिक प्रशिक्षण यशदा व वनामती या प्रशिक्षण संस्थांमार्फत घेण्याचे निर्देश दिनांक २०.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिले आहेत. तर अशा प्रकारे प्रशिक्षण संस्थेमध्ये होणा-या तांत्रिक प्रशिक्षणाच्या कालावधीतील लेखी परीक्षा व इतर निकषाच्या आधारे मूल्यमापन त्या प्रशिक्षण संस्थेकडून करण्यात येईल. परंतु ज्या विभागांकडून तांत्रिक प्रशिक्षण घेण्यात येईल त्या ठिकाणी संबंधित संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांची लेखी परीक्षा व इतर निकषांच्या आधारे मुल्यमापन संबंधित संवर्ग नियंत्रक विभाग करेल व परिवीक्षाधीन अधिका-यांनी प्राप्त केलेले गुण यशदा आणि वनामती या संस्थेला कळवेल.

** जिल्हास्तरीय प्रशिक्षण : जिल्हास्तरीय ६६ आठवड्यांच्या प्रशिक्षणामध्ये शेवटच्या २ आठवड्यांमध्ये संबंधित विभाग सर्व परिवीक्षाधीन अधिका-यांची ४० गुणांची लेखी परीक्षा आयोजित करेल. या लेखी परीक्षेसाठी सर्व परिवीक्षाधीन अधिका-यांसाठी एकच प्रश्नपत्रिका असेल. यामधील प्रश्न वस्तुनिष्ठ (Objective-Multiple Choice Questions) असतील. परीक्षेच्या उत्तर पत्रिका विभाग़ाकडून आवश्यकत्या संख्येत अधिका-यांचा गट तयार करुन (२-३ अधिकारी) त्यांचेमार्फत तपासण्यात येतील. या परीक्षेमध्ये परिवीक्षाधीन अधिका-याने प्राप्त केलेले गुण या टप्प्याचे प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर कमाल २ आठवड्याच्या अवधीत यशदा व वनामतीला विभागाकडून कळविण्यात येतील.

*** जिल्हास्तरीय ६६ आठवड्यांच्या प्रशिक्षणामध्ये विभागीय नियंत्रक अधिका-याचे मुल्यमापनाचे गुण तो परिवीक्षाधीन अधिकारी ज्या अधिका-याच्या नियंत्रणाखाली विभागाचे प्रशिक्षण घेत आहे अशा अधिका-याने द्यावेत (उदा. परिवीक्षाधीन उपजिल्हाधिका-याचे इतर निकषाच्या आधारे मूल्यमापनाचे गुण संबंधित जिल्हाधिका-यांनी, नायब तहसिलदाराच्या बाबतीत उपविभाग़ीय अधिका-याने, परिवीक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिका-याला हे गुण मुख्य कार्यकारी अधिका-याने, परिवीक्षाधीन जिल्हा उपनिबंधक यांना संबंधित जिल्हा उपनिबंधक यांनी द्यावेत इ.). इतर निकषांच्या आधारे मूल्यमापनाचे गुण देताना संबंधित परिवीक्षाधीन अधिका-याची संपूर्ण कालावधीतील नियमित उपस्थिती, वक्तशीरपणा, वर्तणूक, सहका-याशी वागणूक, सचोटी, सामान्य नागरीकाशी वागणूक, प्रशिक्षण व शिक्षणातील त्याचा कल इत्यादी गुणांचा विचार करण्यात यावा.

\# पोलीस उप अधीक्षक संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांसाठी उपरोक्त तक्त्यातील अ.क्र. २ ते ५ हे प्रशिक्षणाचे टप्पे संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक यांच्या नियंत्रणाखाली होणार

असल्यामुळे या टप्प्यांची मुल्यांकन पध्दत संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक हे निश्चित करतील. पोलीस अकादमीतील मुल्यांकनासाठी एकंदरित ७० गुणांचे मूल्य निश्चित करण्यात आले असून, या कालावधीत परिवीक्षाधीन अधिका-याने प्राप्त केलेले गुण व एकूण गुण याबाबतची माहिती घेऊन यशदा संस्थेमार्फत त्याचे ७० गुणांच्या तुलनेत प्राप्त केलेले गुण निश्चित करुन त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येईल.

२. वरील परिच्छेदामध्ये नमूद केल्यानुसार परिवीक्षाधीन कालावधीतील लेखी परीक्षेद्वारे आणि इतर निकषांच्या आधारे केलेल्या मूल्यमापनात एकूण २०० गुणांपैकी मिळालेले गुण आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या निवड प्रक्रियेत संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांला मिळालेले एकूण गुण (मुख्य परीक्षा आणि मुलाखतीचे गुण) यांची बेरीज करुन त्यानुसार सदर अधिकाऱ्यांची संबंधित संवर्गातील त्या तुकडीतील अंतिम सेवाज्येष्ठता, प्रशिक्षण संस्थांकडून त्यासंदर्भातील माहिती घेऊन, सामान्य प्रशासन विभाग (सेवा) ठरवेल. अशा प्रकारे ठरविली जाणारी अंतिम सेवाज्येष्ठता पदोन्नती तसेच सेवा विषयक सर्व अनुषंगिक बाबींसाठी लागू राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४२२१२०९२८५६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.04.22 12:31:59 +05'30'

( **डॉ. भगवान सहाय** )
अपर मुख्य सचिव (सेवा)

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
२) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
५) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
६) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
७) निवडनस्ती कार्यासन १८-ब.